**महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमातील कलम ३१३ मध्ये सुधारणा करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग,**
**शासन परिपत्रक क्रमांक पीसीसी-३०१५/प्र.क्र.७५(१)/नवि-२२**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक:- २४ एप्रिल, २०१५

**-: परिपत्रक :-**

महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमातील कलम ३१३ मधील तरतुदीनुसार महानगरपालिका क्षेत्रात कोणताही कारखाना, कर्मशाळा किंवा कामाची जागा, किंवा कोणतीही बेकरी सुरु करण्यापूर्वी महापालिका आयुक्तांची लेखी परवानगी घेणे आवश्यक आहे. या कलमातील तरतुदीनुसार औद्योगिक विकास क्षेत्रात ज्यांनी औद्योगिक विकास महामंडळाकडून कारखाना सुरू करण्यासाठी अगोदरच परवानगी घेतलेली आहे, अशा घटकांनादेखील त्याच कारणास्तव महानगरपालिका आयुक्तांकडून पुन्हा परवानगी घेणे आवश्यक आहे.

२. शासनाच्या, व्यापार करतांना सोपेपणा (Ease of doing business) या धोरणाच्या अनुषंगाने उद्योजकांना व्यवसाय करणे सुलभ व्हावे तसेच अशा प्रकारे एकाच उद्योग घटकासाठी शासनाच्या दोन प्राधिकरणांकडून परवानगी घेणे संयुक्तिक नसल्याने, यामध्ये सुसुत्रता आणण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. परिणामी, महानगरपालिका हद्दीतील औद्योगिक विकास क्षेत्रातील महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाकडून उद्योजकाने परवानगी घेतली असल्यास त्याच प्रयोजनासाठी पुन्हा महानगरपालिकेकडून परवानगी घ्यावी लागू नये, याकरिता महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमातील कलम ३१३ मधील परंतुकानंतर दुसरे जादा परंतुक दाखल करण्याबाबतचे विधेयक विधानमंडळाच्या सन २०१५ च्या अर्थसंकल्पीय अधिवेशनात संमत करण्यात आले असून, त्याअनुषंगाने महाराष्ट्र शासन राजपत्रात दिनांक १८.४.२०१५ रोजी सन २०१५ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक १८ प्रसिध्द करण्यात आला आहे. सदर परंतुक खालीलप्रमाणे आहे.:-

**“ परंतु, आणखी असे की, महानगरपालिकेच्या अधिकारितेतील महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाद्वारे अधिसूचीत केलेल्या क्षेत्रामध्ये कारखाने, कर्मशाळा किंवा कामाच्या जागेच्या बाबतीत अशा परवानगीची आवश्यकता असणार नाही.”**

३. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१५०४२४१४४४३६८५२५ असा आहे. हे शासन परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Eknath Kisan Sahane

Digitally signed by Eknath Kisan Sahane
DN: CN = Eknath Kisan Sahane, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = Urban Development Department
Date: 2015.04.24 16:32:58 +05'30'

**(ए.कि.सहाणे)**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. विरोधी पक्ष नेते, विधानपरिषद/विधानसभा महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई.
२. मा. सर्व सन्माननीय सदस्य विधानपरिषद/विधानसभा
३. अप्पर मुख्य सचिव/प्रधान सचिव /सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग.
४. मा. मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव.
५. मा. राज्यपाल महोदयांचे सचिव,
६. सर्व विभागीय आयुक्त.
७. सर्व जिल्हाधिकारी.
८. सर्व महानगरपालिका आयुक्त.
९. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ लि. अंधेरी, (पूर्व) मुंबई
१०. सर्व मा. मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
११. मा.मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक.
१२. मा. संचालक, माहिती व जनसंपर्क विभाग, मंत्रालय, मुंबई
१३. मा. मुख्यमंत्री महोदयांचे जनसंपर्क अधिकारी.
१४. सर्व मंत्रालयीन विभाग.
१५. निवड नस्ती (नवि-२२)